विभागाच्या मान्यताप्राप्त अनुदानित आश्रमशाळेतील मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजनेसाठी द्यावयाचे नियोक्त्याचे समतुल्य अंशदान तसेच कर्मचाऱ्यांच्या जमा होणाऱ्या अंशदानावर व्याज देण्यासाठी तरतुद करणेबाबत.
नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. पअंनियो-२०१८/प्र.क्र.६७/विजाभज-२**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २८ जानेवारी, २०२०.

**वाचा :-** सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.सकआ-२०१२/ प्र.क्र.४७८/ आस्था-२, दि.९ नोव्हेंबर, २०१२.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाने दिनांक ३१/१०/२००५ च्या शासन निर्णयान्वये १/११/२०१५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी, सध्या अस्तित्वात असलेल्या निवृत्तीवेतन योजनेऐवजी केंद्र शासनाच्या धर्तीवर नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू केली आहे.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ९/११/२०१२ च्या शासन निर्णयान्वये विमुक्त जाती व भटक्या जमाती आश्रमशाळा व विद्यानिकेतन, ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळा यामध्ये सेवेत दिनांक १/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत नवीन परिभाषित योजना दि.१/११/२००५ पासून अंमलात आणली असून त्याबाबतची कार्यपध्दती विहित केली आहे.

विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळा व ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळा यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे हे नियंत्रक अधिकारी व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण हे उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण म्हणून काम पाहतील असेही वरील शासन निर्णयात नमूद केले आहे.

मार्च, २०१८ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात "विजाभज आश्रमशाळेत कार्यरत असणाऱ्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांची नविन पेन्शन योजनेतील शासनाची रक्कम अदा करणेबाबत" विधानपरिषदेत तारांकित प्रश्न उपस्थित करण्यात आला. प्रश्नाच्या अनुषंगाने संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालावरुन राज्यातील काही आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांकडून त्यांचे अंशदान वेतनातून कपात करण्यात येत असल्याचे दिसते तथापि, शासनाचे समतुल्य अंशदान जमा होत नसल्याचे दिसून येते.

शासनाच्या समतुल्य अंशदानासाठीच्या तरतुदीबाबत तसेच जमा होणाऱ्या अंशदानावर अदा करावयाच्या व्याजाच्या तरतुदीसाठी कोणतेही लेखाशिर्ष नसल्याचे निदर्शनास आणण्यात आले आहे.

वित्त विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे शासन निर्णय तसेच विधानमंडळात उपस्थित झालेले कामकाज पाहता या विभागाने मान्यता दिलेल्या व १००% अनुदानित आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी द्यावयाचे नियोक्त्याचे समतुल्य अंशदान तसेच कर्मचाऱ्याचे व नियोक्त्याचे जमा होणारे अंशदान यावर व्याज देण्याकरिता तरतुद करण्यासाठी नविन लेखाशिर्षे घेण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेकरिता कर्मचाऱ्यांचे अंशदान, सदर योजनेंतर्गत शासनाचे अंशदान, कर्मचाऱ्यांकडून जमा केलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा तसेच सदर योजनेंतर्गत जमा होणाऱ्या अंशदानावर द्यावयाचे व्याज यासाठी महालेखापाल व वित्त विभागाच्या मान्यतेने खालीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | लेखाशिर्षाचे मराठी नांव | लेखाशिर्षाचे इंग्रजी नांव |
|---|---|---|---|
| (१) | मागणी क्र. | जी-९९ | G-99 |
| | मुख्य लेखाशिर्ष | ८३४२-इतर ठेवी | 8342-Other Deposits |
| | उपमुख्य लेखाशिर्ष | ००- | 00- |
| | गौणशिर्ष | ११७-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 117-Defined Contribution Pension Scheme |
| | गटशिर्ष | ०१-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 01- Defined Contribution Pension Scheme |
| | उपशिर्ष | (०१)(१८) परिभाषित अंशदायी निवृत्ती वेतन योजनेंतर्गत विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान (स्तर-१) | (01)(18) DCPS-Contribution of Approved and Aided Institutions Employees under VJNT, OBC and SBC Welfare Department (Tier-1) |
| | संगणक सांकेतांक | ८३४२५५१७०१ | 8342551701 |
| (२) | मागणी क्र. | जी-९९ | G-99 |
| | मुख्य लेखाशिर्ष | ८३४२-इतर ठेवी | 8342-Other Deposits |
| | उपमुख्य लेखाशिर्ष | ००- | 00- |
| | गौणशिर्ष | ११७-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 117-Defined Contribution Pension Scheme |
| | गटशिर्ष | ०२-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 02- Defined Contribution Pension Scheme |

| | | | |
|---|---|---|---|
| | उपशिर्ष | (०२)(२२) परिभाषित अंशदायी निवृत्ती वेतन योजनेंतर्गत विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या कर्मचाऱ्यांचे अंशदान (स्तर-२) | (02)(22) DCPS-Contribution of Approved and Aided Institutions Employees under VJNT, OBC and SBC Welfare Department (Tier-2) |
| | संगणक सांकेतांक | ८३४२५५२६०१ | 8342552601 |
| (३) | मागणी क्र. | जी-९९ | G-99 |
| | मुख्य लेखाशिर्ष | ८३४२-इतर ठेवी | 8342-Other Deposits |
| | उपमुख्य लेखाशिर्ष | ००- इतर ठेवी | 00- Other Deposits |
| | गौणशिर्ष | ११७-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 117-Defined Contribution Pension Scheme |
| | गटशिर्ष | ०१-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 01- Defined Contribution Pension Scheme |
| | उपशिर्ष | (०१)(१९) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या कर्मचाऱ्यांकरीता परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजना (शासनाचे अंशदान) | (01)(19) DCPS for Approved and Aided Institutions Employees under VJNT, OBC and SBC Welfare Department (Government Contribution) |
| | संगणक सांकेतांक | ८३४२५५३५०१ | 8342553501 |
| (४) | मागणी क्र. | जी-९९ | G-99 |
| | मुख्य लेखाशिर्ष | ८३४२-इतर ठेवी | 8342-Other Deposits |
| | उपमुख्य लेखाशिर्ष | ००- इतर ठेवी | 00- Other Deposits |
| | गौणशिर्ष | ११७-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 117-Defined Contribution Pension Scheme |
| | गटशिर्ष | ०४-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 04- Defined Contribution Pension Scheme |
| | उपशिर्ष | (०४)(०६) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या कर्मचाऱ्यांकडून जमा केलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या अंशदानाचा परतावा | (04)(06) Refund of Contribution Collected Under DCPS from staff of Approved and Aided Institutions Employees under VJNT, OBC and SBC Welfare Department |
| | संगणक सांकेतांक | ८३४२०२३९ | 83420239 |
| (५) | मागणी क्र. | झेडजी-०१ | ZG-01 |
| | मुख्य लेखाशिर्ष | २०४९-व्याज प्रदाने | 2049-Interest Payments |
| | उपमुख्य लेखाशिर्ष | ६०-इतर दायित्वावरील व्याज | 60-Interest on Other Obligations |
| | गौणशिर्ष | १०१-ठेवीवरील व्याज | 101-Interest on Deposits |

| | | | |
|---|---|---|---|
| | गटशिर्ष | ०१-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना | 01- Defined Contribution Pension Scheme |
| | उपशिर्ष | (०१) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त व अनुदानित संस्थांच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेवरील व्याज | (01) Interest of defined Contribution Pension Scheme for Teachers and Non-teaching staff of approved and aided institutions under VJNT, OBC and SBC Welfare Department |
| | | अनिवार्य-भारित | Committed-Charged |
| | संगणक सांकेतांक | २०४९२७०२ | 20492702 |

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत नियोक्त्याचे (शासनाचे) अंशदान यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडजी-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५ याखाली न नोंदविता मागणी क्र.जी-६ (वित्त विभाग) लेखाशिर्ष २०७१०६४२ (२०७१-०१-११७-०१-०४-शासनाचे अंशदान-निवृत्तीवेतनावरील खर्च) याखाली नोंदविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि./चा-१/विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग/युओआर-६३/२०१९-२०/२९५६, दिनांक १३/९/२०१९ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७३९/१९ व्यय-१४, दि.३१/१२/२०१९ व अनौपचारिक संदर्भ क्र.१०/अर्थसंकल्प, दि.२४/१/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१३२५४२२०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.01.28 13:26:57 +05'30'

(भा. र. गावित)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (इमाव, सावशैमाप्र,विजाभज आणि विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (इमाव, सावशैमाप्र,विजाभज आणि विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. मा.अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मा.प्रधान सचिव, इमाव, सावशैमाप्र,विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे.
१२. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
१३. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
१४. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. सर्व मुख्याध्यापक, विजाभज, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा,
१७. निवडनस्ती (विजाभज-२).